राज्यात कोवीड-१९ या महामारीच्या प्रादुर्भावामुळे उद्भवलेल्या परिस्थितीत दिनांक १२.११.२०२० ते दिनांक १६.११.२०२० या कालावधीत राज्यातील शाळांना दिवाळी सणाच्या सुट्ट्या घोषित करण्याबाबत.

महाराष्ट्र शासन
शालेय शिक्षण व क्रीडा विभाग
शासन परिपत्रक क्रमांकः संकिर्ण-२०२०/प्र.क्र.२००/एस.डी.-४
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ०५ नोव्हेंबर, २०२०.

वाचा :- १) शासन निर्णय क्रमांक संकीर्ण-२०१५/प्र.क्र.२०६/एसडी-२,दिनांक ८ सप्टेंबर,२०१५.
२) शासन परिपत्रक क्रमांक संकीर्ण-२०२०/प्र.क्र.८६/एसडी-६,दिनांक २२ जुलै,२०२०.
३) आयुक्त ( शिक्षण ),पुणे यांचे दिनांक ०४ नोव्हेंबर,२०२० चे पत्र.

शासन परिपत्रक:-

राज्यात कोव्हीड-१९ या महामारीच्या प्रादुर्भावामुळे उद्भवलेल्या परिस्थितीत राज्यातील शाळा प्रत्यक्षात सुरू करणे शक्य नसल्याने दिनांक १५ जून,२०२० पासून शैक्षणिक वर्ष सुरू करून स्थानिक परिस्थितीनुसार प्रत्यक्ष शाळा सुरू करण्याबाबत निर्णय घेण्याचे अधिकार संबंधित जिल्हाधिकारी,महानगर पालिका आयुक्त व संबंधित शाळा व्यवस्थापन समिती यांना या विभागाच्या दिनांक १५ जून,२०२० रोजीच्या शासन निर्णयानुसार प्रदान करण्यात आले आहेत. तसेच शासनाच्या दिनांक २२ जुलै,२०२० च्या परिपत्रकातील सूचनेनुसार इयत्ता पूर्व प्राथमिक ते १२ वी च्या विद्यार्थ्यांना ऑनलाईन शिक्षण सुरू करण्यात आले आहे.

माध्यमिक शाळा संहिता नियम ५२.२ नुसार शैक्षणिक वर्षातील सर्व प्रकारच्या एकूण सुट्टया ७६ दिवसापेक्षा जास्त होणार नाहीत, तसेच एकूण कामाचे दिवस २३० दिवस होणे आवश्यक आहे. इयत्ता १ ली ते ५ वीच्या वर्गासाठी शैक्षणिक वर्षातील शाळेतील शिक्षकांच्या कामाचे दिवस किमान २०० व इयत्ता ६ वी ते ८ वीच्या वर्गासाठी शैक्षणिक वर्षातील शाळेतील शिक्षकांच्या कामाचे दिवस किमान २२० होणे आवश्यक आहे. शालेय अभ्यासक्रम शैक्षणिक वर्षात पूर्ण करण्याच्या दृष्टीने दिनांक १२ नोव्हेंबर ते दिनांक १६ नोव्हेंवर या कालावधीत दिवाळी सन असल्याने शाळांना सुट्टी घोषित करण्यात येत आहे. या कालावधीत शाळांमार्फत घेण्यात येणारे ऑनलाईन पध्दतीने सुरू असलेले अध्यापनाचे कामकाज बंद राहील.

सदर शासन परिपत्रक महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आले असून त्याचा संकेताक २०२०११०५१५०१४०४८२१ असा आहे. हे परिपत्रक डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

RAJENDRA SHANKARRAO PAWAR

Digitally signed by RAJENDRA SHANKARRAO PAWAR
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=SCHOOL EDUCATION & SPORT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=679184b88f7019ef64ad6ddc2495ca280267c0d4755ce63fa70c45cf755d9373, serialNumber=01d5ac9d227fcf738d4d5a366976c83175db4f058411807fb1031c17dd155677, cn=RAJENDRA SHANKARRAO PAWAR
Date: 2020.11.05 15:04:38 +05'30'

**( राजेंद्र पवार )**

उप सचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१) मा.मंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,

२) मा.राज्यमंत्री (शालेय शिक्षण) यांचे खाजगी सचिव,

३) मा.अपर मुख्य सचिव,शालेय शिक्षण व क्रीडा विभाग यांचे स्वीय सहायक

४) आयुक्त (शिक्षण),महाराष्ट्र राज्य,पुणे,

५) राज्य प्रकल्प संचालक,महाराष्ट्र प्राथमिक शिक्षण परिषद,मुंबई

६) संचालक,राज्य शैक्षणिक संशोधन व प्रशिक्षण परिषद,महाराष्ट्र,पुणे

७) शिक्षण संचालक (माध्यमिक व उच्च माध्यमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे,

८) शिक्षण संचालक (प्राथमिक),महाराष्ट्र राज्य,पुणे

९) सर्व विभागीय शिक्षण उपसंचालक

१०) प्राचार्य,जिल्हा शैक्षणिक सातत्यपूर्ण विकास संस्था (सर्व),

११) शिक्षणाधिकारी(प्राथमिक/माध्यमिक/निरंतर),जिल्हा परिषद (सर्व) /सर्व शिक्षण निरीक्षक बृहन्मुंबई महानगरपालिका,

१२) प्रशासन अधिकारी (महानगरपालिका/नगरपालिका) (सर्व),

१३) निवड नस्ती (कार्या.एस.डी.४).